सराईत अपराधी व अपराधी परिविक्षा योजनेस सन २०२३-२४ या अर्थसंकल्पीय वर्षातील निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. अपअ-२०२३/ प्र.क्र.३९/ का-९**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- २६/०६/२०२३

वाचा- वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३ दि.१२ एप्रिल, २०२३

प्रस्तावना -

केंद्र शासनाचा १९५८ चा अधिनियम व महाराष्ट्र अपराधी परिविक्षा अधिनियम, १९५८ अंतर्गत ही योजना राबविण्यात येते. मा. न्यायालयाच्या आदेशानुसार मुक्त केलेले परिविक्षाधीन/मुक्त बंदी/ कारागृहातील शिक्षा भोगत असलेले बंदी यांनी शासनाकडे पुनर्वसनासाठी मागणी केल्यास त्यांना दि. १४/१०/२०१६ व दि. १३/०६/२०१८ रोजीच्या शासन निर्णयानुसार रु. २५,०००/- पर्यंत सहायक अनुदान वस्तूरुपाने दिले जाते. सदर योजनेअंतर्गत निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

महिला व बाल विकास विभागांतर्गत “सराईत अपराधी व अपराधी परिविक्षा योजना” या योजनेस सन २०२३-२४ या अर्थसंकल्पीय वर्षात मागणी क्र.एक्स-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, १०६ सुधार सेवा, (०१) सराईत अपराधी व अपराधी परिवीक्षा योजना, (०१) (०१) सराईत अपराधी व अपराधी परिवीक्षा योजना (कार्यक्रम) (२२३५-०११३) या लेखाशीर्षाखाली ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टासाठी अर्थसंकल्पित रु.४०.०० लक्ष (रु. चाळीस लक्ष फक्त) निधी मधून या शासन निर्णयाद्वारे रु.०४.०० लक्ष (रु. चार लक्ष फक्त) निधी आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करण्यात येत आहे.

२. वित्त विभागाच्या दि. १२/४/२०२३ रोजीच्या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.९ मध्ये नमूद अटी/शर्तीची पुर्तता करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३. सदर निधी महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियमपुस्तीकेमध्ये उल्लेख केलेल्या अटी व शर्तीचे पालन करुन खर्च करण्यात यावा. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे हे राहतील. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च होईल व खर्च झालेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास त्वरीत सादर करण्यात येईल याची संबंधितांनी दक्षता घ्यावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०६२६१४३६०४५४३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KANCHAN SANJAY JAGTAP

Digitally signed by KANCHAN SANJAY JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e760047a41cc72cdc271a758371fb5ab8e76fb0330785d73b1c0a811b0bdc816, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AD0702347116FA2B3F1408C7E9F6C58F3D5B234C20164E9729E1607D00506B07, cn=KANCHAN SANJAY JAGTAP
Date: 2023.06.26 14:38:46 +05'30'

**( कांचन जगताप )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.
२. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. परिविक्षा अधिक्षक, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (आयुक्तालया मार्फत)
८. कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई, यांना विनंती करण्यात येते की, सदर निधी आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना तात्काळ वितरीत करण्यात यावा.
९. निवड नस्ती (का-९).